सोने व चांदीच्या आयातीवरील मुद्रांक शुल्क माफ/कमी केल्यास राज्याच्या महसूलावर होणाऱ्या संभाव्य परिणामांचा सर्वंकष अभ्यास करण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण १२२२/प्र.क्र.०१/कराधान-२**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०६.०१.२०२२

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यामध्ये आयात होणाऱ्या सोने-चांदीवर आकारणी करण्यात येणारे ०.१ % मुद्रांक शुल्क माफ/कमी करण्यासंदर्भात विनंती प्रस्ताव शासनास प्राप्त झाले आहेत.

उपरोक्त बाबत "महाराष्ट्र राज्यामध्ये आयात होणाऱ्या सोने-चांदीच्या डिलीव्हरी ऑर्डरच्या दस्तांवर महाराष्ट्र मुद्रांक अधिनियमाच्या अनुसूची-१ मधील अनुच्छेद-२९ नुसार आकारणी करण्यात येणारे मुद्रांक शुल्क माफ/कमी केल्यास राज्याच्या महसूलावर होणाऱ्या संभाव्य परिणामांचा सर्वंकष अभ्यास करून शासनास शिफारशी करण्यासाठी" समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्यामध्ये आयात होणाऱ्या सोने-चांदीच्या डिलीव्हरी ऑर्डरच्या दस्तांवर महाराष्ट्र मुद्रांक अधिनियमाच्या अनुसूची-१ मधील अनुच्छेद-२९ नुसार आकारणी करण्यात येणारे मुद्रांक शुल्क माफ/कमी केल्यास राज्याच्या महसूलावर होणाऱ्या संभाव्य परिणामांचा सर्वंकष अभ्यास करून शासनास शिफारशी करण्याबाबत मा.अपर मुख्य सचिव (वित्त) यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे समिती नेमण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १. | मा.अपर मुख्य सचिव (वित्त) | अध्यक्ष |
| २. | मा. अपर मुख्य सचिव (महसूल, मुद्रांक शुल्क व नोंदणी) | सदस्य |
| ३. | मा. प्रधान सचिव (वित्तीय सुधारणा) | सदस्य |
| ४. | मा. राज्यकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य | सदस्य |
| ५. | मा. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य | सदस्य सचिव |

**सदर समितीची कार्यकक्षा :-**

१. महाराष्ट्र राज्य व इतर राज्यामध्ये आयात होणाऱ्या सोने-चांदीच्या डिलीव्हरी ऑर्डरच्या दस्तांवरील मुद्रांक शुल्क रचनेची तुलना करणे.

२. महाराष्ट्र राज्यामध्ये आयात होणाऱ्या सोने-चांदीच्या डिलीव्हरी ऑर्डरच्या दस्तांवरील मुद्रांक शुल्क माफ/कमी केल्यास सदर उद्योग क्षेत्रावर व राज्याच्या महसूलावर होणारा संभाव्य परिणामांचा सर्वंकष अभ्यास करून शासनास शिफारशी करणे.

३. पुढील वाटचालीबाबत (रोडमॅप) शिफारशी करणे.

४. समितीने प्रस्तुत अहवाल १ महिन्यात सादर करावा.

नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, पुणे सदस्य सचिव हे उक्त निवड समितीचे संयोजक असतील.

सदर समितीस शासन स्तरावरून सर्व मदत कक्ष अधिकारी, म-१ (धोरण) ,महसूल व वन विभाग हे करतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक सांकेतांक २०२२०१०६१४४८२२१३०५ असा आहे. सदर शासन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Mandar Ashok Kelkar

Digitally signed by Mandar Ashok Kelkar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=500b03a2acf8670cbc3af82871445df8c6c5862fbed7679822233103ec4e8926, pseudonym=642BBB7ACDF63B41604A454A3975AC69E04A2D82, serialNumber=DC44279B721C6B725B0DB2B28A9A9ACEB0719B69B051F7861850C8129F723861, cn=Mandar Ashok Kelkar
Date: 2022.01.06 14:49:42 +05'30'

**( मंदार केळकर )**
उप सचिव, कराधान
वित्त विभाग

**प्रत,**

१) मा.अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहाय्यक.
२) मा.अपर मुख्य सचिव ( महसूल, मुद्रांक शुल्क नोंदणी ), मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहाय्यक.
३) मा.प्रधान सचिव ( वित्तीय सुधारणा ), मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहाय्यक.
४) मा.राज्यकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य.
५) मा.नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य.
६) सह सचिव, म-१ (धोरण), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) निवडनस्ती कराधान-२.